**राज्य प्रशासकीय व्यवसाय शिक्षण संस्था, मुंबई व भारतीय प्रशासकीय सेवा पुर्व प्रशिक्षण केंद्र, कोल्हापूर, नागपूर, औरंगाबाद, नाशिक व अमरावती येथील प्रशिक्षणार्थ्यांच्या विद्यावेतनात वाढ करणेबाबत.**

# महाराष्ट्र शासन
## उच्च व तंत्र शिक्षण विभाग
## शासन निर्णय क्रमांकः प्रीआय-५४१७/प्र.क्र.७५/मशि-२

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
तारीख: ०५ सप्टेंबर, २०१८.

वाचा :- शासन निर्णय क्रमांकः राप्रव्यशि-२००९/प्र.क्र. ७३(२)/मशि-२, दिनांक ३१ मे, २०११.

**प्रस्तावना :-**

महाराष्ट्रातील होतकरु, बुध्दीमान विद्यार्थ्यांना आय.ए.एस. व आय.पी.एस. इत्यादीसारख्या केंद्रीय लोकसेवा आयोगातर्फे आयोजित केल्या जाणाऱ्या स्पर्धात्मक परीक्षेसाठी प्रशिक्षण देऊन, त्यायोगे त्यांचे यशस्वी होण्याचे प्रमाण वाढावे व पर्यायाने महाराष्ट्रातील विद्यार्थ्यांना पुरेसा वाव मिळावा, या हेतूने शासनाने राज्य प्रशासकीय व्यवसाय शिक्षण संस्था, मुंबई व भारतीय प्रशासकीय सेवा परीक्षा पुर्व प्रशिक्षण केंद्र, कोल्हापूर, नागपूर, औरंगाबाद, नाशिक व अमरावती या प्रशिक्षण संस्था स्थापन केलेल्या आहेत. संदर्भाधीन शासन निर्णयान्वये सदर प्रशिक्षण केंद्रातील प्रशिक्षणार्थ्यांना दरमहा रु.२,०००/- एवढे विद्यावेतन देण्यास मंजूरी देण्यात आलेली आहे.

सन २०१८-१९ च्या अर्थसंकल्पीय भाषणामध्ये मा. वित्त मंत्री यांनी, महाराष्ट्रातील बुध्दीमान होतकरु उमेदवारांचे, संघ लोकसेवा आयोगातील सेवांमध्ये प्रमाण वाढविण्यासाठी विद्यार्थ्यांच्या विद्यावेतनात चालू आर्थिक वर्षापासून रु.२ हजारावरून रु.४ हजार इतकी वाढ करण्याची घोषणा केलेली आहे. त्यानुसार राज्य प्रशासकीय व्यवसाय शिक्षण संस्था, मुंबई व भारतीय प्रशासकीय सेवा परीक्षा पुर्व प्रशिक्षण केंद्र, कोल्हापूर, नागपूर, औरंगाबाद, नाशिक व अमरावती येथील प्रशिक्षणार्थ्यांच्या विद्यावेतनात वाढ करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

राज्य प्रशासकीय व्यवसाय शिक्षण संस्था, मुंबई व भारतीय प्रशासकीय सेवा परीक्षा पुर्व प्रशिक्षण केंद्र, कोल्हापूर, नागपूर, औरंगाबाद, नाशिक व अमरावती येथे प्रशिक्षण घेणाऱ्या प्रशिक्षणार्थींचे मासिक विद्यावेतन सन २०१८-१९ या शैक्षणिक वर्षापासून रु.४,०००/- (रुपये चार हजार फक्त) इतके करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

२. सदर प्रयोजनासाठी येणारा खर्च, राज्य प्रशासकीय व्यवसाय शिक्षण संस्था, मुंबई व भारतीय प्रशासकीय सेवा पूर्व प्रशिक्षण संस्था, नागपूर, कोल्हापूर व औरंगाबाद या संस्थांसाठी, लेखाशीर्ष: "मागणी क्रमांक:डब्ल्यू-२, २२०२-सर्वसाधारण शिक्षण, ००३ प्रशिक्षण (२) प्रशिक्षण (०२)(०१), राज्य प्रशासनिक सेवा संस्था (अनिवार्य) (२२०२ ११३३)" व भारतीय प्रशासकीय सेवा पूर्व प्रशिक्षण केंद्र, अमरावती व नाशिक या प्रशिक्षण संस्थांसाठी लेखाशीर्ष: "मागणी क्रमांक:डब्ल्यू-२, २२०२-सर्वसाधारण शिक्षण, ००३ प्रशिक्षण (२) प्रशिक्षण (०२)(०३), शासकीय महाविद्यालयात भारतीय प्रशासनिक सेवा पूर्व प्रशिक्षण केंद्र उघडणे (अनिवार्य) (२२०२ एच १०८)" या लेखाशिर्षाखालील मंजूर तरतुदीतून भागविण्यात यावा.

३. सदर शासन निर्णय नियोजन विभागाच्या व वित्त विभागाच्या सहमतीने व त्या विभागाच्या अनुक्रमे अनौपचारिक संदर्भ क्रमांक ११०/१४७१, दिनांक १४.०५.२०१८ व क्रमांक:६४९/२०१८/व्यय-५, दिनांक ०२.०८.२०१८ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८०९०५१७१३४५८१०८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Hariram V Parhate

Digitally signed by Hariram V Parhate
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Higher And Technical Education Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=8bfd656b321bf6c348564562d46cd2934b62b770484625206559a2c204e56cb8, serialNumber=d01f16685aedf1abc9cfd58347280b4c4cb8d304afd1d413884ef4d91aa1462d, cn=Hariram V Parhate
Date: 2018.09.05 17:17:45 +05'30'

**( ह. व्यं. पऱ्हाते )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन.**

**प्रत,**

१. संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे,
२. सर्व विभागीय सह संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य,
३. संचालक, राज्य प्रशासकीय व्यवसाय शिक्षण संस्था, हजारीमल सोमानी मार्ग, मुंबई-०१.
४. संचालक, भारतीय प्रशासकीय सेवा परीक्षा पुर्व प्रशिक्षण केंद्र, कोल्हापूर/नागपूर/औरंगाबाद/नाशिक/अमरावती.
५. महालेखापाल (लेखा परीक्षा)-१, महाराष्ट्र, मुंबई,
६. महालेखापाल (लेखा परीक्षा)-२, महाराष्ट्र, नागपूर,
७. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई/नागपूर,

८. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,
९. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
१०. जिल्हा कोषागार अधिकारी, कोल्हापूर/नागपूर/औरंगाबाद/नाशिक/अमरावती.
११. कार्यासन अधिकारी (कार्यासन-१४७१), नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई,
१२. कार्यासन अधिकारी (व्यय-५), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई,
१३. कार्यासन अधिकारी (मशि-३), उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई,
१४. कार्यासन अधिकारी (साशि-१), उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई,
१५. निवडनस्ती-मशि-२.